प्रेषक महिला टेक्सटाइल्स गारमेंट औदयोगिक उत्पादक को- ऑप. सोसायटी लि., सोलापुर या संस्थेच्या जागा बदलास मंजुरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. यंत्रमाग- २००९/प्र.क्र.२९२/टेक्स-२**
१६ वा माळा, नवीन प्रशासकीय भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २४ ऑगस्ट, २०१७.

वाचा :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक:- यंत्रमाग-१३९८/प्र.क्र.१५८/टेक्स-२, दिनांक २४ फेब्रुवारी, १९९९.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक:- यंत्रमाग-१३०६/प्र.क्र.१४१/टेक्स-२, दिनांक २२ जानेवारी, २००९.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक:- यंत्रमाग-२००९/प्र.क्र.२९२/टेक्स-२, दिनांक ३१ मार्च, २०१७.
४) शासन शुद्धीपत्रक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक:- यंत्रमाग-२००९/प्र.क्र.२९२/टेक्स-२, दिनांक १५ मे, २०१७.
५) संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांचे पत्र क्रमांक:-कार्या-४/यंत्रमाग/ प्रेषकमहिला/५८०२/२०१७, दिनांक २९ जुलै, २०१७.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त वाचा क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये प्रेषक महिला टेक्स्टाईल गारमेंट औद्योगिक उत्पादक को-ऑप सोसायटी लि. सोलापूर या संस्थेस शासकीय भागभांडवलाची रक्कम वितरीत करण्यात आलेली आहे. सदर संस्थेने रक्कम वितरीत करतेवेळी सोलापूर येथील दक्षिण सदर बाजार पेठेतील सिटी सर्वे नंबर ६० टी.पी. नं. ३, प्लॉटनं.७७११/२ चे एकूण क्षेत्रफळ ४०३२.०० चौ.मी. पैकी क्षेत्र ९२९.३६ चौ.मी. इतकी जमीनखरेदी केलेबाबतची माहिती सादर केली होती. आता वाचा क्र. ५ अन्वये संचालक (वस्त्रोद्याग) यांनी सदर संस्थेने गारमेंट प्रकल्प उभारणीच्या दृष्टीने दि. १८ जुलै, २०१७ रोजी सह.दुय्यम निबंधक वर्ग-२ सोलापूर दक्षिण यांचेकडील दस्त क्र. १९५८/२०१७ अन्वये बसवनगर येथील गट नं.१०/१, ही लोकमंगल डेव्हलपर्स लि., तर्फे संचालक श्री. धनंजय शिवाजीराव पाटील यांच्या मालकीची किमान ०.४१ हे.आर. इतकी जागा प्रती वर्ष रक्कम रु. २.०० लाख भाडेपट्ट्याने भाडेदरात प्रती ३ वर्षास १५ टक्के वाढ प्रमाणे ३० वर्षाच्या कालावधीसाठी घेतलेली असून सदर जागेवर प्रकल्प उभारण्यास मान्यता देण्याची विनंती केलेली आहे. त्यानुषंगाने प्रेषक महिला टेक्स्टाईल गारमेंट औद्योगिक उत्पादक को-ऑप सोसायटी लि. सोलापूर या संस्थेच्या जागा बदलाच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वाचा क्र.३ येथील शासन निर्णयान्वये प्रेषक महिला टेक्स्टाईल गारमेंट औद्योगिक उत्पादक को-ऑप सोसायटी लि. सोलापूर या संस्थेस सोलापूर येथील दक्षिण सदर बाजार पेठेतील सिटी सर्वे नंबर ६० टी.पी. नं. ३, प्लॉटनं.७७११/२ चे एकूण क्षेत्रफळ ४०३२.०० चौ.मी. पैकी क्षेत्र ९२९.३६ चौ.मी. या जागेवर गारमेंट प्रकल्प उभारणीस मान्यता देण्यात आलेली होती. आता सदर संस्थेस गारमेंट प्रकल्प उभारणीच्या दृष्टीने दि. १८ जुलै, २०१७ रोजी सह.दुय्यम निबंधक वर्ग-२ सोलापूर दक्षिण यांचेकडील दस्त क्र. १९५८/ २०१७ अन्वये बसवनगर येथील गट नं.१०/१, ही लोकमंगल डेव्हलपर्स लि., तर्फे संचालक श्री. धनंजय शिवाजीराव पाटील यांच्या मालकीची किमान ०.४१ हे.आर. या भाडेपट्ट्याने घेतलेल्या जागेवर प्रकल्प उभारण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. संबंधित संस्थेकडुन सदर भाडेपट्ट्याने घेतलेल्या जमिनीवरच खर्च होईल याची दक्षता संचालक (वस्त्रोद्योग) यांनी घ्यावी.

३. संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर/ प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग), सोलापूर यांनी प्रेषक महिला टेक्स्टाईल गारमेंट औद्योगिक उत्पादक को-ऑप सोसायटी लि. सोलापूर या संस्थेने जागा बदललेनुसार सदर भाडेपट्ट्याने घेतलेल्या बसवनगर येथील गट नं.१०/१, ही लोकमंगल डेव्हलपर्स लि., तर्फे संचालक श्री. धनंजय शिवाजीराव पाटील यांच्या मालकीची ०.४१ हे.आर. जागेवर प्रकल्प उभारणीच्या दृष्टीकोनातून सर्व संबंधित विभागाकडून ना-हरकत प्रमाणपत्र घेऊनच पुढील कार्यवाही करावी.

४. या प्रकरणीवाचा क्र. १, २ व ३ मधील अटी जशाच्या तशा लागू राहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०८२४१५१६२४०९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Pramod D. Tupe

Digitally signed by Pramod D. Tupe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=28590802f030b209e5b1d488527383f61acb2a10c00b8e9718dcbbc845a30f9b, cn=Pramod D. Tupe
Date: 2017.08.24 15:07:59 +05'30'

**(प्रमोद द. तुपे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, ( लेखापरीक्षा ) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर.
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर.
३) प्र.स. (वस्त्रोद्योग), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ३२.
४) सह सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (रोख शाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग. (३ प्रती)
६) व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली.
७) विभागीय संचालक (पश्चिम), राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५ बी.जे.रोड,पुणे.
८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.
१०) प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग), सोलापूर.
११) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर, जि. नागपूर.
१२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३) संचालक, लेखा व कोषागारे (संगणक विभाग), नविन प्रशासकीय भवन, मुंबई.
१४) सहसंचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१६) नियोजन विभाग (कार्या-१४३१), मंत्रालय, मुंबई ३२.
१७) वित्त विभाग ( व्यय-२/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई.
१८) अवर सचिव (२१-स/१७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) कक्ष अधिकारी ( १६-स ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (२ प्रती)
२१) चेअरमन, प्रेषक महिला टेक्सटाइल्स गारमेंट औदयोगिक उत्पादक को- ऑप. सोसायटी लि., सोलापुर
२२) निवड नस्ती (टेक्स-२).